“किंमत संनियंत्रण कक्षांचे बळकटीकरण करणे (Strengthening of Price Monitoring Cell)” या १००% केंद्रपुरस्कृत योजने अंतर्गत” एकोणीस बाजारभाव संकलन केंद्रांसाठी सन २०२४-२५ करिता मंजूर निधीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.२८६/नापु-२५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ जून, २०२५.

वाचा :- १. केंद्र शासनाचे पत्र क्र. T-१०/१०/२०१९-PMC Section, दिनांक १९ ऑगस्ट, २०२१ मार्गदर्शक सूचना.
२. अन्न ,पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग नागरी ,शासन निर्णय क्र.सांख्यिकी-२०२३/प्र.क्र.१२२/नापु-२५ दिनांक ०८ ऑगस्ट, २०२३ व समक्रमांकित शासन शुद्धीपत्रक दिनांक २२ ऑगस्ट, २०२३.
३. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No. T-१०/२५/२०१८-PMC, दिनांक:- २८ मे, २०२५.

**प्रस्तावना :-**

“किंमत संनियंत्रण कक्षाचे बळकटीकरण (Strengthening of Price Monitoring Cell)” या १००% केंद्रपुरस्कृत योजनेअंतर्गत (Planned Scheme) बाजारभाव संकलन केंद्रांनी संकलित केलेले बाजारभाव तत्परतेने पाठविण्यासाठी तसेच संनियंत्रण कक्षाचे बळकटीकरण/ दर्जा सुधारण्यासाठी केंद्र शासनाच्या (Strengthening of Price Monitoring Cell) दिनांक १९ ऑगस्ट, २०२१ च्या सुधारित मार्गदर्शक सुचनानुसार राज्यातील प्रत्येक बाजारभाव संकलन केंद्रांसाठी कंत्राटी तत्वावरील डाटा एंट्री ऑपरेटर (Data Entry Operator) ची नेमणूक करणे आणि स्मार्ट फोन व सिमकार्ड/ डाटा कार्ड खरेदी करणे, यासाठी केंद्र शासनाकडून निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीनुसार पुढील शासन निर्णयाप्रमाणे सदर योजनेअंतर्गत बाबनिहाय तरतूद उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. शासनाच्या संदर्भ क्र. २ अन्वये “किंमत संनियंत्रण कक्षाचे बळकटीकरण (Strengthening of Price Monitoring Cell)” या १००% केंद्रपुरस्कृत योजनेअंतर्गत सन २०२३-२४ मध्ये रु. ८७,७४,०००/- तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली. यापैकी मार्च २०२४ अखेर अखर्चित रक्कम रु. ४,२१,८२५/- वर्ष २०२४-२५ मध्ये खर्च करण्याकरिता केंद्र शासनामार्फत उपलब्ध करुन

देण्यात आली. यापैकी रु. ९६,५००/- एवढी रक्कम सन २०२३-२४ करिता तसेच रु. ३,२५,१९०/- रक्कम सन २०२४-२५ करिता संबंधित केंद्रांमार्फत खर्च करण्यात आले आहेत. यानुसार केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये **"किंमत संनियंत्रण कक्षांचे बळकटीकरण करणे" या योजने अंतर्गत** राज्यातील मुंबई, नागपूर, पुणे, नाशिक, धारणी-अमरावती, माणगाव-रायगड, लातूर, अकलूज-सोलापूर, राहुरी-अहमदनगर, खुलताबाद-औरंगाबाद, चंद्रपूर, कराड-सातारा, आर्णी-यवतमाळ, कणकवली-सिंधुदुर्ग, जळगाव, इस्लामपूर- सांगली, परतूर-जालना, अकोला व गोंदिया येथील एकोणीस बाजारभाव संकलन केंद्रांसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या कालावधीसाठी **परिशिष्ट "अ"** नुसार बाबनिहाय एकूण **रुपये ५२,१२,३४३/- (अक्षरी रुपये बावन्न लाख बारा हजार तीनशे त्रेचाळीस फक्त)** इतके वित्तीय सहाय्य मंजूर केले असून खर्च करण्यास मंजूरी दिली आहे. सन २०२३-२४ करिता प्राप्त निधी पैकी अखर्चित निधी सन २०२४-२५ करिता खर्च करण्याकरिता यापूर्वी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. यानुसार सदर निधी संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग या कार्यालयामार्फत बाबनिहाय वितरीत करण्यासाठी मान्यता या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहे. उक्त खर्च खालील CNA खात्यावरील रकमेतून करण्यात यावा.

"CNA **खाते क्र. ४३७१६३७१८५९** , Agency Code- Maharashtra४०००"

२. केंद्र शासनाच्या दिनांक १९ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या मार्गदर्शक सूचनेप्रमाणे, वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांनी नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई, तसेच जिल्हा पुरवठा अधिकारी व अन्नधान्य वितरण अधिकारी यांचे अंतर्गत संबंधित बाजारभाव संकलन केंद्रांना वितरीत करण्यात आलेल्या निधीपैकी खर्च करण्यात आलेल्या तपशीलाच्या आधारे, निर्धारित कालावधीत विहित स्वरुपात उपयोगिता प्रमाणपत्र जी.एफ.आर. २०१७ (GFR २०१७) तसेच विहित स्वरुपात आर्थिक प्रगती प्रमाणपत्र (Financial Progress Certificate, Annexure-III) केंद्र शासनास व राज्य शासनास सादर करणे बंधनकारक आहे.

३. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई तसेच संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी व अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी केंद्र शासनाच्या दि. १९ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या मार्गदर्शक सूचनेप्रमाणे परिच्छेद क्र. ३.२ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक आहे.

४. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांना असे निर्देश देण्यात येत आहेत की, केंद्र शासनाने मंजूर केलेले डाटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन व सिमकार्ड/ डाटा कार्ड ची सन २०२४-२५ करिता माहे मार्च २०२५ पर्यंतची रक्कम वितरीत केली आहे. सदरची रक्कम संबंधित केंद्रांना माहे जून-२०२५ पर्यंत संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी किंवा अन्नधान्य वितरण अधिकारी यांच्या खात्यावर वितरीत करण्यात यावी. तसेच महालेखापाल

कार्यालयांशी खर्चाचा ताळमेळ, विहीत कार्यपध्दतीचे पालन करुन त्याबाबतचा अहवाल केंद्र शासनास व राज्य शासनास सादर करावा. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ३ मधील पत्रात रु. ६३७/- रक्कम अखर्चित असल्याबाबत कळविण्यात आल्यानुसार याबाबत निधी खर्च झालेला असल्यास त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास व राज्य शासनास तात्काळ सादर करावे. तसेच सदर निधीबाबत केंद्र शासनासोबत आवश्यक पत्रव्यवहार करुन केलेल्या कार्यवाहीबाबत राज्य शासनास अवगत करण्यात यावे.

५. सदरील आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-१, अनुक्रमांक ६, नियम क्र. ४०(१) मधील तरतुदीनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०५१६३६४८१००६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=250b23140177f1b91b8d23d0003fea615e62e9fa665cd65cd822d17139dee73b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D5A263499F325CA90E9E04FA83D69E04FD5CB75F96BB3FC42610EB9D879192B, cn=SHITAL ANAND RAMTEKE
Date: 2025.06.05 16:37:35 +05'30'

**( शितल रामटेके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
२. उप आयुक्त (पुरवठा), नागपूर/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ कोकण/ अमरावती.
३. अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर/ पुणे/ सोलापूर.
४. जिल्हा पुरवठा अधिकारी, नाशिक/ अमरावती/ रायगड/ लातूर/ नागपूर/ पुणे/ सोलापूर/ अहमदनगर/ औरंगाबाद/ चंद्रपूर/ सातारा/ यवतमाळ/ सिंधुदुर्ग/ जळगाव/ सांगली/ जालना/ अकोला/ गोंदिया.
५. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई, **उचित कार्यवाहीसाठी**.
६. महालेखापाल १/ २, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
७. महालेखापाल १/ २, (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई.

१०. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/ अमरावती/ रायगड/ लातूर/ नागपूर/ पुणे/ सोलापूर/ अहमदनगर/औरंगाबाद/ चंद्रपूर/ सातारा/ यवतमाळ/ सिंधुदुर्ग/ जळगाव/ सांगली/ जालना/ अकोला/ गोंदिया.

११. अवर सचिव (कार्या-१४७५), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३. निवड नस्ती (नापु-२५).

## परिशिष्ट "अ"

| बाब (Component) | प्रति बाजारभाव संकलन केंद्रास मंजूर संख्या | प्रति नग/ व्यक्ती मंजूर निधी (रुपये) | बाजारभाव संकलन केंद्रांची संख्या (नावे) | एकूण निधी (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **(अ) अनावर्ती खर्च (२ वर्षातून एकदा)** | | | | |
| १) स्मार्ट फोन | १ | १०,०००/- | १ (अकलूज-सोलापूर) | १०,०००/- |
| | | | **एकूण (अ)** | **१०,०००/-** |
| **(ब) आवर्ती खर्च (प्रत्येक वर्षासाठी)** | | | | |
| १) सिमकार्ड/ डाटा कार्ड | १ | ६,०००/- | १८ (मुंबई, नागपूर, पुणे, नाशिक, धारणी-अमरावती, माणगाव-रायगड, लातूर, अकलूज-सोलापूर, राहुरी-अहमदनगर, खुलताबाद-औरंगाबाद, चंद्रपूर, कराड-सातारा, आर्णी-यवतमाळ, कणकवली-सिंधुदुर्ग, इस्लामपूर- सांगली, परतूर-जालना, अकोला व गोंदिया) | १,०५,९१०/- |
| २) कंत्राटी कर्मचारी (डाटा एंट्री ऑपरेटर) यांचे मानधन | १ | २४००० * १२ महिने = २,८८,०००/- | १९ (मुंबई, नागपूर, पुणे, नाशिक, धारणी-अमरावती, माणगाव-रायगड, लातूर, अकलूज-सोलापूर, राहुरी-अहमदनगर, खुलताबाद-औरंगाबाद, चंद्रपूर, कराड-सातारा, आर्णी-यवतमाळ, कणकवली-सिंधुदुर्ग, जळगाव, इस्लामपूर-सांगली, परतूर-जालना, अकोला व गोंदिया) | ५०,९६,४३३/- |
| | | | **एकूण (ब)** | **५२,०२,३४३/-** |
| | | | **एकूण (अ) + (ब)** | **५२,१२,३४३/-** |

**(अक्षरी रुपये बावन्न लाख बारा हजार तीनशे त्रेचाळीस फक्त)**

“किंमत संनियंत्रण कक्षांचे बळकटीकरण करणे (Strengthening of Price Monitoring Cell)” या १००% केंद्रपुरस्कृत योजने अंतर्गत निधीबाबतचे विवरणपत्र. (दिनांक ३१ मार्च, २०२५ पर्यंत)

परिशिष्ट “अ”

| अ. क्र. | बाजारभाव संकलन केंद्राचे नांव | सन २०२३-२४ करिता अखर्चित रक्कमेतून उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी खर्चाचा बाबनिहाय तपशील | | एकूण रुपये | केंद्राच्या संदर्भ क्र. ३ नुसार सन २०२४-२५ करिता प्राप्त निधी करिता बाबनिहाय तरतूद | | | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | आवर्ती खर्च (प्रत्येक वर्षासाठी) सिमकार्ड/ डाटा रु. ६,०००/- | कंत्राटी कर्मचारी डाटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन (रु. २४००० - १२ महिने = २,८८,०००/-) | | अनावर्ती खर्च (२ वर्षातून एकदा) स्मार्ट फोन रु. १०,०००/- | आवर्ती खर्च (प्रत्येक वर्षासाठी) सिमकार्ड/ डाटा रु. ६,०००/- | कंत्राटी कर्मचारी डाटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन (रु. २४००० - १२ महिने = २,८८,०००/-) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | मुंबई | ₹ ४,००० | ₹ ० | ₹ ४,००० | ₹ ० | ₹ ७,२४३ | ₹ २,८८,००० | ₹ २,९५,२४३ |
| २ | नागपूर | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| ३ | पुणे | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| ४ | नाशिक | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| ५ | माणगाव -रायगड | ₹ ० | ₹ १२,००० | ₹ १२,००० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,७६,००० | ₹ २,८२,००० |
| ६ | धारणी - अमरावती | ₹ ० | ₹ २४,००० | ₹ २४,००० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,६४,००० | ₹ २,७०,००० |
| ७ | लातूर | ₹ १,७५० | ₹ ० | ₹ १,७५० | ₹ ० | ₹ ४,२५० | ₹ २,८८,००० | ₹ २,९२,२५० |
| ८ | अकलूज-सोलापूर | ₹ ० | ₹ ३३,२९० | ₹ ३३,२९० | ₹ १०,००० | ₹ ५,००० | ₹ १,९२,००० | ₹ २,०७,००० |
| ९ | आर्णी-यवतमाळ | ₹ ० | ₹ १,९२,००० | ₹ १,९२,००० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ ९६,००० | ₹ १,०२,००० |
| १० | चंद्रपूर | ₹ ० | ₹ १२,००० | ₹ १२,००० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,७६,००० | ₹ २,८२,००० |
| ११ | कराड-सातारा | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| १२ | राहुरी- अहमदनगर | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| १३ | खुलताबाद- छत्रपती संभाजीनगर | ₹ ० | ₹ १३,४६७ | ₹ १३,४६७ | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,७४,५३३ | ₹ २,८०,५३३ |
| १४ | इस्लामपूर- सांगली | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |

| अ. क्र. | बाजारभाव संकलन केंद्राचे नांव | सन २०२३-२४ करिता अखर्चित रक्कमेतून उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी खर्चाचा बाबनिहाय तपशील | | एकूण रुपये | केंद्राच्या संदर्भ क्र. ३ नुसार सन २०२४-२५ करिता प्राप्त निधी करिता बाबनिहाय तरतूद | | | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | आवर्ती खर्च (प्रत्येक वर्षासाठी) सिमकार्ड/ डाटा रु. ६,०००/- | कंत्राटी कर्मचारी डाटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन (रु. २४००० - १२ महिने = २,८८,०००/-) | | अनावर्ती खर्च (२ वर्षातून एकदा) स्मार्ट फोन रु. १०,०००/- | आवर्ती खर्च (प्रत्येक वर्षासाठी) सिमकार्ड/ डाटा रु. ६,०००/- | कंत्राटी कर्मचारी डाटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन (रु. २४००० - १२ महिने = २,८८,०००/-) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १५ | कणकवली-सिंधुदुर्ग | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| १६ | परतूर-जालना | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,८८,००० | ₹ २,९४,००० |
| १७ | गोंदिया | ₹ ० | ₹ २०,५०० | ₹ २०,५०० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ २,६७,५०० | ₹ २,७३,५०० |
| १८ | जळगाव | ₹ ६,००० | ₹ ० | ₹ ६,००० | ₹ ० | ₹ ० | ₹ २,८८,००० | ₹ २,८८,००० |
| १९ | अकोला | ₹ ५८३ | ₹ ५,६०० | ₹ ६,१८३ | ₹ ० | ₹ ५,४१७ | ₹ २,८२,४०० | ₹ २,८७,८१७ |
| | **एकूण** | **₹ १२,३३३** | **₹ ३,१२,८५७** | **₹ ३,२५,१९०** | **₹ १०,०००** | **₹ १,०५,९१०** | **₹ ५०,९६,४३३** | **₹ ५२,१२,३४३** |

**(अक्षरी रुपये बावन्न लाख बारा हजार तीनशे त्रेचाळीस फक्त)**

टिप -

१. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये मुंबई, नागपुर, पुणे व नाशिक केंद्रांसाठी हँड हेल्ड डिवाइस विथ जिओ टॅगिंग फॅसिलिटी अनावर्ती खर्च (५ वर्षातून एकदा) देण्यात आला आहे.

२. बाजारभाव संकलन केंद्र मुंबई करिता नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांचेमार्फत कळविण्यात आल्यानुसार रु. ५८८०/- ही रक्कम सिमकार्ड/ डाटा कार्ड या बाबी अंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आली आहे. तसेच केंद्र शासनामार्फत रु. ६३७/- रक्कम कमी उपलब्ध करुन देण्यात आल्यानुसार सद्यस्थितीत सदर रक्कम सिमकार्ड/ डाटा कार्ड या बाबी अंतर्गत कमी देण्यात आली आहे. यानुसार (रु. २०००- रु.६३७ + रु.५८८०) सिमकार्ड/ डाटा कार्ड या बाबी अंतर्गत रु. ७२४३/- रक्कम उपलब्ध करुन देण्यात आली आहे.